**"क" दर्जा प्राप्त दर्जेदार मराठी चित्रपटांना निर्मितीसाठी प्रोत्साहनपर अर्थसहाय्य मंजूरीस वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मचिअ-२०२४/प्र.क्र.९१ (अ)/सां.का.-१.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा :** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. मचिअ-२०१२/प्र.क्र.१४१/ सां.का.१, दि.३० ऑक्टोबर, २०१३
२) शासन शुध्दीपत्रक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक मचिअ-२०१२/ प्र.क्र.१४१/सां.का.१, दि.२८ ऑगस्ट, २०१४
३) शासन शुध्दीपत्रक,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक मचिअ-२०१२/ प्र.क्र.१४१/सां.का.१, दि.०८ ऑगस्ट, २०१८
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. गोचिन-२०२२/प्र.क्र.५८/ सां.का.१, दि.२५ जानेवारी, २०२३
५) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. गोचिन-२०२२/प्र.क्र.५८/ सां.का.१, दि.०३ मार्च, २०२३
६) सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचे दि.१८ जुलै, २०२४ रोजीचे पत्र
७) विभागाचे दि. १९ सप्टेंबर, २०२४ रोजीचे इतिवृत्त
८) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. मचिअ-२०२४/प्र.क्र.९१(अ)/ सां.का.१, दि.०७ ऑक्टोबर, २०२४
९) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१५/ सां.का.१., दि.२७ मार्च, २०२५

**प्रस्तावना:**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी प्रोत्साहन देण्याकरीता अर्थसहाय्य करण्यासाठी उपनिर्दिष्ट १ अन्वये धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने, दि.०४ सप्टेंबर, २०२४ रोजी मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली चित्रपट अनुदानाबाबत चित्रपट निर्माते, दिग्दर्शक, तज्ञ इत्यादी चित्रपट क्षेत्राशी निगडीत आढावा बैठक संपन्न झाली. सदर बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार उपनिर्दिष्ट ८ अन्वये "क" दर्जा प्राप्त चित्रपटांना देखील अनुदान प्रदान करण्याबाबत समावेश करण्यात आलेला आहे.

सदर चित्रपट अनुदानाच्या पात्रता तपासण्यासाठी संदर्भ क्र. ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर गठीत समितीमार्फत छाननी अंती शिफारस केलेल्या "क" दर्जा प्राप्त एकूण २३ चित्रपटांना अनुदान प्रदान करण्यासाठी संदर्भ क्र.८ अन्वये रुपये २,३०,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी तीस लक्ष फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय देण्यात आली

आहे. सदर निधी सन २०२४-२०२५ मध्ये अपुरा असल्याने संदर्भ क्र. ९ अन्वये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध झालेल्या निधीनुसार रुपये १,७५,००,०००/- (रुपये एक कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या निधीची प्रतिपूर्ती महामंडळास उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी प्रोत्साहन योजनेंतर्गत माहे फेब्रुवारी, २०२४ ते मे, २०२४ रोजी परिक्षण करण्यात आलेल्या “क” दर्जा प्राप्त चित्रपटांना अनुदान प्रदान करण्यासाठी एकूण रुपये १,७५,००,०००/- (रुपये एक कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या रकमेची प्रतिपूर्ती महामंडळास करण्यासाठी या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** यासाठी होणारा खर्च “मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती कार्यक्रम (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०७) मराठी चित्रपट निर्मितीसाठी सहायक अनुदान **(२२०५ १५९९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)** ”या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षात प्राप्त झालेल्या निधीमधून भागविण्यात यावा. <u>सदरचे अनुदान सशर्त आहे.</u>

**०३.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३३/२०२५/का-१४४३, दि.१४.०२.२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९५/२०२५/व्यय-१५, दि.१९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये विहित अटी व शर्ती पूर्ततेच्या अधिन मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या प्रयोजनार्थ वितरित निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करणे बंधनकारक राहिल. यासाठी, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२८११३९१४५१२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.03.28 11:40:34 +05'30'

**( अनिरुध्द सू. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.
४. उपसचिव (सां.का.१) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (सां.का.१).